महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा) गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्यामध्ये संबंधित अधिकाऱ्यांच्या विनंतीच्या अनुषंगाने अंशत: बदल करण्याबाबत-शिक्षणाधिकारी व तत्सम

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३११८/प्र.क्र.८८/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०४ सप्टेंबर, २०१८

वाचा:- १) शा.शि.व क्री.वि., शासन निर्णय.क्र.ईएसटी-३९१७/प्र.क्र.४६/प्रशा-२, दिनांक १७.०३.२०१७
२) शा.शि.व क्री.वि., शासन आदेश क्र. बदली ३११८/प्र.क्र.८८/प्रशा-२, दि. १८.०५.२०१८

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार दिनांक ३१ मे, २०१८ रोजी तीन वर्षाचा कालावधी पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या बदलीचे आदेश दिनांक १८.०५.२०१८ रोजी निर्गमित करण्यात आले आहेत. त्यामध्ये काही अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्यासंदर्भात शासनाकडे विनंती केली होती. सदर विनंती मान्य करण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ४ (४) दोन व नियम ४ (५) मधील तरतुदीस अनुसरुन सक्षम प्राधिकाऱ्यांनी व लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या पूर्व मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक- ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर सुधारित स्वरुपात पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | दिनांक १८.०५.२०१८ अन्वये करण्यात आलेली पदस्थापना | सुधारीत पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. मोहन देसले, शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. धुळे | शिक्षणाधिकारी( प्राथमिक), जि.प. बुलढाणा | शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जि.प.पालघर | विनंतीनुसार रिक्त पदावर |
| २ | श्री. बी. आर.कुंडगीर, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जि.प. परभणी | शिक्षणाधिकारी (निरंतर) जि.प. वर्धा | शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जि.प. नांदेड | विनंतीनुसार रिक्त पदावर |

३. तथापि, वरील तक्त्यात नमूद अधिकारी हे दिनांक १८.०५.२०१८ च्या आदेशान्वये दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू झाले असतील तर हे आदेश अंमलात येणार नाही.

४. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/ अकरा, दिनांक ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१८०९०४१४५८२६७७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.09.05 11:38:56 +05'30'

**(र. प्र. आटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद
३) सर्व शिक्षण संचालक
४) सर्व विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
५) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७) शिक्षणाधिकारी( प्राथमिक/माध्यमिक/निरंतर) जि.प. धुळे/बुलढाणा/पालघर/परभणी/वर्धा/नांदेड
८) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३) निवडनस्ती.